**राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या योजनेअंतर्गत रुसा संचालनालयास निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रूसायो २०२४/प्र.क्र.३१/विशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: १५ मार्च, २०२४.

**वाचा :**

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.०८ डिसेंबर, २०२३
(२) केंद्र शासनाचे पत्र क्र. F. No.२४-२/२०२४-U. Policy (MH-SC), दि.०५.०३.२०२४.
(३) राज्य प्रकल्प संचालनालयाचे पत्र क्र. राप्रसं/रुसा/२०२३-२४/२४२, दि.१४.०३.२०२४.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१३ मध्ये राज्यातील उच्च शिक्षण संस्थांना धोरणात्मक निधी पुरविण्याच्या उद्देशाने सुरु करण्यात आली आहे. राज्य शासनाने दि.२० मे, २०१५ च्या शासन निर्णयानुसार राज्यात रुसा योजनेची अमंलबजावणी करण्यात आली. राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या केंद्र पुरस्कृत योजनेचा पहिला टप्पा २०१३ मध्ये व दुसरा टप्पा २०१८ मध्ये अंमलात आणण्यात आला आहे. आता, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) या केंद्र पुरस्कृत योजनेचा पुढील टप्पा राष्ट्रीय शैक्षणिक धोरणाच्या (NEP) धर्तीवर प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान (PM USHA) या नावाने सुरु करण्यात आला आहे. प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान योजनेची मार्गदर्शक तत्वे दि.२४ जून २०२३ रोजी निर्गमित करण्यात आली आहेत. यामध्ये निधीतील केंद्र व राज्याचे योगदानाचे प्रमाण ६०:४० आहे. प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान (PM-USHA) योजनेत एकूण ५ घटक समाविष्ट आहेत.

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान/ प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान च्या प्रकल्प मंजूरी मंडळाच्या दिनांक १७ आणि १८ जानेवारी, २०२४ रोजी झालेल्या पहिल्या बैठकीमध्ये प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियानाच्या घटक क्र.१ Multi-Disciplinary Education and Research University (MERU) मध्ये महाराष्ट्र राज्यातील ४ विद्यापीठांना प्रत्येकी रु.१००.०० कोटी आणि घटक क्र.२- Grants to Strengthen Universities (Accredited & Unaccredited Universities) मध्ये महाराष्ट्र राज्यातील ७ विद्यापीठाना प्रत्येकी रु.२०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे.

दिनांक ०५.०३.२०२४ च्या पत्रान्वये शिक्षण मंत्रालय, केंद्र शासनाने या प्रयोजनासाठी पहिला हप्त्यापोटी रु.२१,२५,००,०००/- इतका निधी केंद्र हिस्सा म्हणून उपलब्ध करुन दिला आहे.

त्यानुसार केंद्र हिस्सा (६० टक्के) रु.२१,२५,००,०००/- (रुपये एकवीस कोटी पंचवीस लक्ष फक्त) व राज्य हिस्सा (४० टक्के) रु.१४,१६,६६,६६७/- (रुपये चौदा कोटी सोळा लक्ष सहास्ष्ठ हजार सहाशे सदुसष्ठ फक्त) असा एकूण रु. ३५,४१,६६,६६७/- (रुपये पस्तीस कोटी एकेचाळीस लक्ष सहास्ष्ठ हजार सहाशे सदुसष्ठ फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संदर्भाधीन दिनांक १४.०३.२०२४ च्या पत्रान्वये केली असून सदर रक्कम राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

उच्च शिक्षण विभाग, भारत सरकार यांनी संदर्भाधीन दिनांक ०५.०३.२०२४ च्या पत्रान्वये प्रधानमंत्री उच्चतर शिक्षा अभियान (PM-USHA) अंतर्गत घटक क्र.१- Multi-Disciplinary Education and Research University (MERU) व घटक क्र.२- Grants to Strengthen Universities (Accredited & Unaccredited Universities) करीता उपलब्ध करुन दिल्याप्रमाणे केंद्र हिस्सा (६० टक्के) रु.२१,२५,००,०००/- (रुपये एकवीस कोटी पंचवीस लक्ष फक्त) व त्यासमरुप राज्य हिस्सा (४० टक्के) रु.१४,१६,६६,६६७/- (रुपये चौदा कोटी सोळा लक्ष सहास्ष्ठ हजार सहाशे सदुसष्ठ फक्त) असा एकूण रु. ३५,४१,६६,६६७/- (रुपये पस्तीस कोटी एकेचाळीस लक्ष सहास्ष्ठ हजार सहाशे सदुसष्ठ फक्त) इतका निधी

राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान यांच्या खात्यामध्ये जमा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात झालेला खर्च सक्षम प्राधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशोब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता राज्य प्रकल्प संचालनालय (रुसा) यांनी सादर केली पाहिजेत.

३. राज्य प्रकल्प संचालनालय (रुसा) यांना केंद्र शासनाने ज्या प्रयोजनार्थ निधी मंजुर केलेला आहे त्या निधीचा वापर त्या प्रयोजनासाठी करावा. खरेदी व बांधकामाची मान्यता विद्यापीठ लेखा संहितेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत घेण्यात यावीत.

४. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयातील तरतूदी व त्या सोबतच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे तसेच तद्नंतर वेळोवेळी देण्यात आलेल्या सूचनांनुसार सदरची खरेदी प्रक्रिया विद्यापीठांनी त्यांच्या स्तरावर पार पाडावी व विहित कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

५. सद्य:स्थितीत राज्य प्रकल्प संचालनालयासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प संचालक, रुसा यांना व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राज्य प्रकल्प सहसंचालक, रुसा यांना घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती कार्यवाही नियंत्रक अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. राज्य हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०३- शासकीय महाविद्यालये व संस्था, (०७) (०१) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली व केंद्र हिश्श्यावरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०३- शासकीय महाविद्यालये व संस्था, (०७) (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.०८ डिसेंबर, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१६४६३४३००८ आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.03.15 16:55:54 +05'30'

**( अ.म. बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.
२) राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४७१), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प कक्ष), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.